राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ
नागरिक धोरण २०१३ ची
अंमलबजावणी करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांक :- ज्येष्ठना २०१६/प्रक्र.७१ /सामासू

नवीन हैद्राबाद हाऊस, शिबीर कार्यालय, नागपूर.
दिनांक :- ०९ जुलै, २०१८

**प्रस्तावना :-**

भारताच्या संविधानातील राज्य धोरणाची निदेशक तत्वावरील अनुच्छेद ३९ क व ४१ मध्ये ज्येष्ठ नागरिक सुस्थितीत असावा अशी तरतूद आहे. ज्येष्ठ नागरिकांचे समाजातील स्थान विचारात घेता त्यांना वृध्दापकाळ चांगल्या तऱ्हेने घालविता यावा, समाजामध्ये त्यांचे जीवन सुसह्य व्हावे, शारिरीक/मानसिक आरोग्य सुस्थितीत रहावे, वृध्दापकाळामध्ये त्यांच्या आर्थिक क्षमता, कामाचा हक्क, शिक्षणाचा हक्क आणि सार्वजनिक मदत मिळविण्यासाठी राज्य शासनाने दि. १४/६/२००४ रोजी राज्याचे ज्येष्ठ नागरिक धोरण, २००४ (भाग-१) जाहिर केले असून त्यामध्ये अखर्चिक बाबींचा समावेश आहे. त्यानंतर राज्याचे सर्वसमावेशक धोरणास मा. मंत्रीमंडळाने दिनांक ३०/०९/२०१३ रोजी मान्यता दिलेली आहे. याबाबत दिनांक १६/०१/२०१८ रोजी मा. मंत्री (सा.न्या.) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत दिलेल्या सुचनेनुसार तसेच राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरणाच्या अंमलबजावणीसाठी स्थापन करण्यात आलेल्या समितीने दिलेल्या मान्यतेनुसार याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्याचे सर्वसमावेशक़ ज्येष्ठ नागरिक धोरणाबाबत दि.३०/०९/२०१३ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये निर्णय घेण्यात आला आहे. त्या अनुषंगाने **सदर शासन निर्णयामध्ये नमूद बाबींकरीता ज्येष्ठ नागरिकांची वयोमर्यांदा ६० वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त अशी करण्यात येत आहे.**

**शासनाचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिकांबाबतचे धोरण.**

राष्ट्रीय धोरणात घालून दिलेल्या तत्वांचे पालन करुन मुख्यत: पुढील घटकांवर लक्ष केंद्रीत करण्याचा राज्य शासन प्रयत्न करेल.

अ) ज्येष्ठ नागरिकांसाठी आर्थिक नियोजन करणे.
ब) ज्येष्ठ नागरिकांच्या आरोग्याची काळजी घेणे.
क) ज्येष्ठ नागरिकांना ताण तणावास तोंड देण्यासाठी सक्षम करणे.

राज्य शासनाच्या सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिकांच्या धोरणाबाबत झालेल्या निर्णयानुसार संबंधित प्रशासकीय विभागाने ज्येष्ठ नागरिक योजनेसंबंधी पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**सार्वजनिक आरोग्य विभाग :**

१) निराधार व गंभीर आजार असलेल्या ज्येष्ठ नागरिकांना धर्मादाय संस्था/स्वंयसेवी संस्था यांनी मदत करण्यासाठी राज्य शासनाकडून आवाहन करण्यात यावे.

२) आजारपणाचे वेळीच निदान होणे व आजारपण होऊ नये म्हणून प्रतिबंधनात्मक योजना ज्येष्ठ नागरिकांसाठी तयार करण्यात यावी. त्याचा प्रचार करण्यात येऊन वेळोवेळी आरोग्यविषयक शिबिरे घेण्यात यावीत.

३) आरोग्यविषयक शिक्षणाचे कार्यक्रम ज्येष्ठ नागरिकांपर्यंत पोहोचवणे आवश्यक आहे. ज्येष्ठांसाठी मानसिक आरोग्य सेवेमध्ये वाढ करण्यात यावी. याकरिता कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांना शासनाचे प्रोत्साहन द्यावे.

४) वैद्यकीय महाविद्यालयांशी संबंधित रुग्णालयामध्ये वृद्धांसाठी ५% खाटांची सोय करावी.

५) शासनाच्या अखत्यारित असलेल्या रुग्णालयांमध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी वेगळी सोय असेल तसेच त्यांना प्राथम्यक्रम देण्यात यावे. त्यांच्यासाठी सल्ला मार्गदर्शनासाठी (कौन्सिलिंग) ठराविक वेळ राखून ठेवण्यात यावी.

६) ज्येष्ठ नागरिकांसाठी वैद्यकीय सेवा व ॲम्ब्युलन्स सेवा उपलब्ध करुन देण्याबद्दल सेवाभावी संस्थांचा सहभाग वाढविण्याचे प्रयत्न करण्यात यावेत.

७) खाजगी वैद्यकीय सुविधा देणाऱ्या संस्था / रुग्णालये / ट्रस्ट यांना ६० वर्षावरील ज्येष्ठ नागरिकांकरिता ५०% सवलत देण्याबाबत आवाहन करण्यात यावे. तसेच खाजगी वैद्यकीय सेवा देणाऱ्या डॉक्टरांना वयोवृध्दांसाठी फी मध्ये सवलत देण्यासाठी आवाहन करण्यात यावे. त्यासाठी वैद्यकीय क्षेत्रातील प्रतिनिधीक संस्थांबरोबर सुसंवाद साधण्यात यावा.

८) वैद्यकीय सेवा व मानसशास्त्रीय उपचार आणि समुपदेशन यांच्या पृष्ठ्यर्थ प्रशिक्षित व्यावसायिक / सामजिक कार्यकर्ते यांची नेमणूक करण्यात यावी.

९) निराधार व्यक्तींच्या धर्तीवर ज्येष्ठ नागरिकांना वैद्यकीय सेवा देण्यात यावी.

१०) सार्वजनिक आरोग्य कार्यक्रमात “वृद्ध चिकीत्सा” याचा समावेश करण्यात यावा.

११) रुग्णालयांमध्ये "ज्येष्ठ नागरिक चिकीत्सा विभाग" व "ज्येष्ठ नागरिकांसाठी स्वतंत्र स्वागत कक्ष" यांचा समावेश करण्यात यावा.

१२) शासकीय रुग्णालयामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी मोफत डायलिसिस सेंटरची स्थापना स्वयंसेवी संस्थांच्या माध्यमातून देण्याचा प्रयत्न करावा.

१३) ज्येष्ठ नागरिकांसाठी आरोग्य तपासणी व उपचार शिबिरे आयोजित करण्यात यावीत. सध्या ज्येष्ठ नागरिकांच्या सहकार्याने काही ठिकाणी अशी शिबिरे आयोजित करण्यात यावीत.

१४) ज्येष्ठ नागरिकांच्या उपचार व पुनर्वसन संदर्भात राज्यातील प्रादेशिक मनोरुग्णालयातील कर्मचाऱ्यांकरीता कालबद्ध प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

१५) राजीव गांधी जीवनदायी योजनेचा लाभ दरवर्षी दारिद्रय रेषेखालील लोकांना दिला जातो. तथापि सदर योजनेतंर्गत ज्येष्ठ नागरिकांना मोफत आरोग्य सेवा देण्याचा प्रयत्न करावा.

१६) आरोग्य विभागाने माहिती व जनसंपर्क कार्यालयामार्फत वृध्दांसाठी व वृध्दांच्या आरोग्याच्या समस्या विषयी रेडियो, टी.व्ही. मार्फत ज्येष्ठ नागरिकांसाठी आरोग्य विषयक कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत. तसेच आयईसी ब्यूरो मार्फत रेडियो जिंगल्स/टि.व्ही. वर फूटनोटस व जाहिराती देण्यात याव्यात.

१७) मेमरी क्लिनीक स्थापनेबाबत कार्यवाही करावी.

१८) सर्व्हेक्षणाद्वारे ज्येष्ठ नागरिकांच्या आरोग्य विषयक समस्या जाणून घेणे व त्यांचेवर उपचार करण्याचे धोरण राबविण्यात यावेत.

१९) ज्येष्ठ नागरिकाने आरोग्य केंद्राकडे संपर्क केल्यास प्राथमिक आरोग्य विषयक तपासणी करुन तक्रारीबाबत संबंधित डॉक्टरांना तात्काळ अवगत करतील. जेणेकरुन वृद्ध रुग्णांवर तात्काळ उपचार करण्यात यावेत.

२०) शासकीय आरोग्य सेवा ज्येष्ठ नागरिकांच्या प्रतिबंधक व रोगमुक्त चिकित्सेवर तसेच आरोग्य शिक्षणावर भर देतील. त्यासाठी जागतिक आरोग्य संघटनेच्या (WHO) सूचनांनूसार प्राथमिक आरोग्य केंद्रांना सक्षम केले जावे. सर्व शासकीय रुग्णालये, महानगरपालिका व नगरपालिका रुग्णालये, प्राथमिक आरोग्य केंद्रांत / उपकेंद्रात पुरेसे वैद्यकीय अधिकारी, परिचारिका, औषधे, वैद्यकीय सुविधा देण्यात याव्यात.

२१) शासकीय रुग्णालये, महानगरपालिका / नगरपरिषदा / नगरपालिका / नगरपंचायत रुग्णालये तसेच प्राथमिक आरोग्य केंद्रे यामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी कालबद्ध शिबिरे घ्यावेत व याबाबत संबंधित ज्येष्ठ नागरिक कक्षास अहवाल सादर करण्यात यावा.

**नगर विकास विभाग :-**

१) महानगरपालिका / नगरपरिषद / नगरपालिका / नगरपंचायती यांची रुग्णालये तसेच प्राथमिक आरोग्य केंद्र यांच्या अखत्यारित असलेल्या रुग्णालयामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी वेगळी व्यवस्था करण्यात यावी. त्यांना प्राथम्यक्रम देण्यात यावा. त्यांच्यासाठी ठराविक वेळ / ठराविक जागा राखून ठेवण्यात याव्यात.

२) स्थानिक स्वराज्य संस्थांचे प्रशासनात वृध्दांच्या अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा घ्यावा. स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये उपलब्ध असलेल्या इमारतीमध्ये अन्य कार्यक्रम सुरु नसताना ज्येष्ठ नागरिकांच्या संस्थांना जागा उपलब्ध करुन देण्यात याव्यात. महानगरपालिका / नगरपालिका / नगरपरिषद / नगरपंचायती यांनी ज्येष्ठ नागरिकांचे करमणुक केंद्र, ज्येष्ठ नागरिक केंद्र इत्यादींसाठी नाममात्र दर किंवा मोफत जागा / ईमारत उपलब्ध करुन द्यावी.

३) ज्येष्ठ नागरिकांच्या आवश्यक गरजा भागविण्यासाठी आवश्यक असलेल्या सेवा उपलब्ध करुन देणारी बहुउद्देशिय केंद्रे, सहकारी गृहनिर्माण संस्थेमध्ये मध्यवर्ती ठिकाणी योजनेत यावीत. त्यासाठी गृहनिर्माण संस्थांचे आराखडे मंजूर करताना योग्य अटी घालण्याचा विचार व्हावा.

४) उद्यानात तसेच पदपथावर ज्येष्ठ नागरिकांसाठी बाकांची व्यवस्था करण्यात यावी. उद्यानात व्हील-चेअर नेण्याची सोय करण्यात यावी.

५) सार्वजनिक बस मध्ये सुलभ रीतीने चढण्यासाठी व्यवस्था करण्यात यावी.

६) अपंगांसाठी तसेच ज्येष्ठ नागरिकांसाठी उपयोगी ठरतील अशा स्वच्छतागृहांची सोय करण्यात यावी. घरातील स्नानगृहात / स्वच्छतागृहात न घसरणाऱ्या फरशा, पकडदांडा बसविण्याबाबत सूचित करण्यात यावे. तसेच नवीन बांधकाम करण्यात येणाऱ्या गृहयोजनेच्या स्वच्छतागृहामध्ये ज्येष्ठ नागरिकांचा सुलभ वावर होईल अशा तरतुदी कराव्या या अटींच्या अधीन राहून इमारतीच्या आराखड्यास मान्यता देण्यात यावी.

७) ज्येष्ठ नागरिकांना ज्याप्रमाणे आयकरामध्ये, प्रवासामध्ये व इतर बाबतीत सवलत दिली जाते त्याप्रमाणे महानगरपालिका, नगरपालिका द्वारा आकारणाऱ्या करामध्ये सवलत देण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

८) मॉल, रेस्टॉरेंट, कार्यालये, सिनेमागृहे व इतर सार्वजनिक ठिकाणी सुलभ अडथळा विरहीत व्हील चेअर प्रवेश तसेच ज्या सोयी-सुविधा उपलब्ध करुन देणे शक्य आहे, त्या देण्यात याव्यात.

९) प्रत्येक जिल्ह्यात ४ वृध्दाश्रमासाठी जागा राखून ठेवण्यात यावी.

१०) विविध निवासी व अनिवासी संकुलात वृद्धाश्रम उभारता यावे याकरिता अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक (एफ.एस.आय.) उपलब्ध करुन देण्यात यावा.

११) नगर विकास विभागाकडून नवीन टाऊनशीप किंवा मोठ्या संकुलास परवानगी देताना वृद्धाश्रम स्थापन करणे सक्तीचे करावे. ज्येष्ठ नागरिकांसाठी बांधण्यात येणाऱ्या वृद्धाश्रम / निवास व्यवस्थेसाठी चटईक्षेत्र निर्देशकांच्या सक्तीची तरतूद करण्यासाठी व त्यासाठी विविध अधिनियमामध्ये आवश्यक सुधारणा करण्यात यावी.

१२) सर्व निवासी, वाणिज्य व इतर संकुले यामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी सोय सुविधांची तरतुद करण्यासाठी मागदर्शक तत्त्वे आखून द्यावीत तसेच यासाठी विकास नियंत्रण नियमावली (DCR) यामध्ये आवश्यक ते बदल करावेत.

**गृह विभाग :**

१) ज्येष्ठ नागरिकांचा विविध स्तरातून होणारा छळ, पिळवणूक यापासून त्यांचे संरक्षण करण्यात यावे.
२) प्रत्येक जिल्ह्यांच्या ठिकाणी तसेच पोलीस आयुक्तालयात ज्येष्ठ नागरिकांसाठी विना शुल्क हेल्प लाईन सुरु करण्यात यावी. याद्वारे आणिबाणीच्या वेळी ज्येष्ठ नागरिकांना तात्काळ आरोग्य सेवा आवश्यक सूचना तथा सुरक्षा विषयक मदत उपलब्ध करण्याबाबत उचित कार्यवाही करावी.
३) ज्येष्ठ नागरिकांना आपत्कालीन परिस्थितीत तातडीने मदत मिळवण्यासाठी आधुनिक तंत्राचा वापर करुन आपात्कालीन सतर्क करणारी यंत्रणा (Emergency Alert System) विकसीत करण्यात यावीत. त्यामध्ये उदा. मोबाईल अलार्म, इंटरनेट, जी.पी.एस. याद्वारे सुरक्षेसाठी संपर्क केल्यास संकट समयी ज्येष्ठ नागरिकांना आहे त्या ठिकाणी मदत देणे शक्य होईल.
४) पोलिसांनी ज्येष्ठांची सुरक्षितता व अन्य प्रश्न यामध्ये जाणीवपूर्वक प्रयत्नशील राहण्यासाठी जागरुकता दाखवावी. ज्येष्ठ नागरिकांना होणारे विविध सतावणूकीसंबंधी (Elderly abuse) तक्रारी प्राधान्याने व खास लक्ष देऊन कायद्याच्या चौकटीत सोडविण्यासाठी प्रयत्न करण्यात यावे.
५) आई वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी नियम २०१० च्या प्रकरण ६ मधील नियम २० मध्ये ज्येष्ठ नागरिकांच्या जिवितांचे व मालमत्तेचे संरक्षण करण्याबाबत कृति आराखडा विनिर्दिष्ट केला आहे. त्याचप्रमाणे पोलीस ठाण्यात त्यांच्या हद्दीत राहणाऱ्या सर्व ज्येष्ठ नागरिकांचे विशेषत: एकाकी राहणाऱ्या ज्येष्ठ नागरिकांची अद्यावत यादी ठेवण्यात यावी.
६) पोलीस ज्येष्ठ नागरिकांवर मैत्रीपूर्ण लक्ष ठेवतील. पोलीस ठाण्याच्या प्रतिनिधीने सामाजिक कार्यकर्ता अथवा स्वयंसेवक यांच्यासह महिन्यातून किमान एकदा एकाकी व अशक्त ज्येष्ठ नागरिकांना सदिच्छा भेट द्यावी.

**गृहनिर्माण विभाग :-**

१) तयार होत असलेल्या सर्व गृहनिर्माणांमध्ये, वाणिज्य, व्यापारी व इतर संकुले यामध्ये ज्येष्ठ नागरिकांसाठी सोयी सुविधांची तरतूद करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे आखून देण्यात यावीत.

२) शासनाच्या इतर गृहनिर्माण योजनांमध्ये वृध्दांना घर / गाळा देताना तळमजल्यावरील घर / गाळा देण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

**महसूल विभाग :-**

१) प्रत्येक जिल्ह्यात वृध्दांसाठी शासकीय जमिनी उपलब्ध करुन देण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

२) आई वडील व ज्येष्ठ नागरिक यांच्या चरितार्थ व कल्याणासाठी अधिनियम २००७ तसेच त्याअंतर्गत दिनांक २३ जून २०१० च्या अधिसूचनेत्वये राज्यात लागू केलेले नियम २०१० यामधील तरतूदींची अंमलबजावणी करुन ज्येष्ठ नागरिकांना त्यांच्या पाल्यांकडून निर्वाह खर्च देण्याची तरतुद केली आहे. राज्यातील प्रत्येक उप विभागात संबंधित उपविभागीय अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली निर्वाह प्राधिकरण स्थापन केले आहे त्याची व्यापक प्रसिध्दी करावी.

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग :-**

१) ज्येष्ठ नागरिकांकरीता व्यावसायिक प्रशिक्षणाचे मार्गदर्शन करण्यात यावे. जेणेकरुन त्यांचे वृद्धत्व उत्पादनक्षम व सकारात्मक बनेल. हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी शासन खाजगी क्षेत्रात कार्यरत असलेल्या अनेक संस्था व अशासकीय संघटनांशी संपर्क साधण्यात यावा.

२) ज्येष्ठ नागरिकांचा विद्यापीठे, ग्रंथालये, संशोधन संस्था आणि सांस्कृतिक केंद्र यांच्याशी संपर्क व सहभाग वाढविण्यात यावा. तसेच ज्येष्ठ नागरिकांचे सामाजिक, सांस्कृतिक, क्रीडा व इतर क्षेत्रातील ज्ञानाची तरुण पिढीशी देवाणघेवाण करण्यासाठी प्रयत्न करण्यात यावेत.

**शालेय शिक्षण विभाग :-**

१) ज्येष्ठ नागरिकांच्या समस्यांची जाणीव समाजात होण्यासाठी विद्यार्थ्यांचे शालेय जीवनापासूनचे वृध्दापकाळात वडीलधाऱ्यांचे जीवनात उद्भवणाऱ्या प्रश्नांबद्दल जाणीव करुन घेणे आवश्यक आहे त्यासाठी शालेय अभ्यासक्रम आखताना याचा विचार करण्यात यावा. जेणेकरुन संस्कारक्षम पाल्य वृद्ध पालकांकडे योग्य दृष्टीकोन ठेवतील.

२) ज्येष्ठ नागरिकांचा शिक्षण संस्था व विद्यार्थ्यांशी संपर्क घडवून सुसंवाद साधण्यात यावा. ज्याने दोघांनाही लाभ होईल.

३) ज्येष्ठ नागरिकांना शिक्षणाच्या, प्रशिक्षणांच्या व माहितीच्या भेदभावविरहीत संधी उपलब्ध करुन द्याव्यात.

४) राष्ट्रीय दिवसाच्या कार्यक्रमांत ज्येष्ठ नागरिकांना विशेष अतिथी म्हणून आमंत्रित करण्यात यावे.

५) पहिली ते बारावी पर्यंतच्या शालेय तसेच महाविद्यालयीन अभ्यासक्रमात मूल्य शिक्षणाच्या उद्दिष्टांपैकी कुटुंबातील वडिलधाऱ्या व्यक्तींशी आदरभाव, परस्पर सहकार्य, बंधुभाव, प्रेम इ. पोषक मुल्यांचे पाठ्यपुस्तकातील धड्याद्वारे मूल्यशिक्षण देण्यात यावे.

**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय :-**

१) ज्येष्ठ नागरिकांच्या आरोग्यविषयक तसेच इतर कार्यक्रमाना तसेच योजनांना प्रसिध्दी देण्यात यावी.
२) वृध्दांचे प्रश्नाबद्दल प्रसार माध्यमाद्वारे सामाजिक स्तरावर जाणीव करुन देणे, प्रबोधन करणे व त्याद्वारे या प्रश्नाबद्दल जागरुकता व संवेदनशिलता निर्माण होणे यासाठी प्रयत्न करण्यात यावा.
३) वृध्दांचे आरोग्य, शिक्षण कार्यक्रम सुनिश्चित करणे या प्रयोजनाकरीता मुख्य प्रसार माध्यमे व इतर संदेश मार्ग यांचा वापर करण्याचा व त्यांना बळकटी देण्याचा प्रयत्न करावा.

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग :-**

१) वृध्दांसाठी असणाऱ्या सर्व योजना एकाच छत्राखाली आणून त्या योजनांचा लाभ संबंधित वृध्दांना देण्यासाठी स्वतंत्र ज्येष्ठ नागरिक कक्ष निर्माण करुन त्याद्वारे सनियंत्रण करावे.
२) दर ५ वर्षानी ज्येष्ठ नागरिक धोरणाचे पुनर्विलोकन (Review) करण्यात यावे.
३) वयोवर्धनाचा व ज्येष्ठांच्या प्रश्नाचा अभ्यास करण्यासाठी वैद्यकीय महाविद्यालये, संशोधन संस्था व सक्षम ज्येष्ठ नागरिकांसाठी काम करणाऱ्या बिगर सरकारी संस्था यांच्या मदतीने ज्येष्ठ नागरिकांसंबंधी व त्यांच्या समस्यासंबंधी माहिती एकत्रित करण्यात यावी. त्याचा ज्येष्ठ नागरिकांचे कल्याण कार्यक्रम आखण्यासाठी उपयोग होईल.
४) राज्य, खाजगी क्षेत्रातील व अशासकीय संघटनांच्या क्षेत्रातील वृध्दाश्रमांना उत्तेजन, सहाय्य व आधार (एकात्मीकृत) द्यावा आणि अशा वृध्दाश्रमांची नोंदणी, मुल्यांकन, संनियंत्रण व त्यांना सहाय्य यासाठी विनियामक सुविधा पुरविण्यात आल्याची खात्री करावी.
५) राज्य शासनाकडून किंवा इतर स्वयंसेवी संस्थाकडून ज्येष्ठ नागरिकांकरीता संस्था चालविण्यात येतात, त्या संस्थाचे कामकाजाचे परिरक्षण एका त्रयस्थ संस्थेकडून करण्यात यावेत यासाठी विद्यापीठाचा व इतर संस्थेचा उपयोग करण्यात यावा.
६) राज्य शासन दर वर्षी ज्येष्ठ नागरिक दिवशी ज्येष्ठ नागरिकांच्या स्थितीबाबत वार्षिक अहवाल (Annual Report on Status of Senior Citizen) प्रसिद्ध करण्यात यावे. ज्यात ज्येष्ठ नागरिकांचे विविध बाबतीत समाधान निर्देशांक (Senior Citizen Contentment Index) प्रसिद्ध करण्यात यावे.
७) राज्य शासनाचे ज्येष्ठ नागरिक कल्याणनिधी स्थापन करावा. त्यांच्या विनियोगासाठी राज्यस्तर, जिल्हास्तर व महानगरपालिका / नगरपालिका स्तरावर समिती गठीत करावी.

८) वृध्दाश्रमांमधील वृद्ध रहिवाशांचे आर्थिक, मानसिक व शारिरीक अशा प्रकारचे शोषण होण्यास प्रतिबंध करण्याबाबत कार्यवाही करावी.

**समाज कल्याण आयुक्तालय :-**

१) राज्यातील मातोश्री / अनुदानित वृद्धाश्रम यांच्या संरचनेत सुधारणा करण्यात यावी.
२) जिल्हा स्तरावर मातोश्री वृध्दाश्रमासाठी असलेली नियंत्रण समितीमध्ये सुधारणा करुन त्या योजनेत वृद्धाश्रम सल्लागार समिती स्थापन करण्यात यावी. या समितीवर ज्येष्ठ नागरिक संघाच्या योग्य प्रतिनिधीचा समावेश करण्यात यावा.
३) वृध्दाश्रमात प्रवेश घेतलेल्या ज्येष्ठ नागरिकांची सुरक्षा व जिविताची काळजी घेण्याची जबाबदारी ही संबंधित वृध्दाश्रमाच्या व्यवस्थापनाची राहील. यात व्यवस्थापनाकडून कसूर झाल्याचे आढळून आल्यास त्याबाबत व्यवस्थापनावर कायदेशीर कारवाई करण्याची तरतूद ठेवावी. तसेच वृध्दाश्रमातील कर्मचारीवृंद हा आवश्यक प्रशिक्षण धारक असेल याची व्यवस्थापनांस दक्षता घेण्याबाबत त्यांना सुचित करावे.
४) ज्येष्ठ नागरिकांनी त्यांच्या आरोग्याची काळजी कशी घ्यावी याबाबत मार्गदर्शक सूचना देण्यासाठी अस्तित्वात कार्यरत असलेल्या ज्येष्ठ नागरिकांच्या संस्थांना प्रोत्साहित करण्यात यावे.

**विधी व न्याय विभाग :**

१) ज्येष्ठ नागरिकांना कायदेविषयक सल्ला व इतर मदत करण्यासाठी विशेष सूचना दिल्या जाव्यात. बार असोसिएशन सारख्या संस्थांनी यामध्ये पुढाकार घेण्यास विनंती केली जावी. जिल्हा / तालुका स्तरावरील ६० वर्षावरील वृद्ध अर्जदार / प्रतिवादी यांचे दावे प्राधान्य देऊन निकालात काढण्यात यावेत.
२) ज्येष्ठ नागरिकांना असलेल्या अधिकाराबाबत जागृती निर्माण करण्याकरिता महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरणातर्फे राज्यातील सर्व जिल्हा विधी सेवा प्राधिकरण तसेच तालुका विधी सेवा समितीतर्फे, सर्व जिल्हा, तालुका तसेच गाव पातळीवर शिबिरे घेण्यात यावीत.

**ग्राम विकास विभाग :**

१) निराधार ग्रामीण भागातील ज्येष्ठ नागरिकांना निवाऱ्याची सोय व्हावी यासाठी पंतप्रधान आवास योजने अंतर्गत प्राथम्य देण्यात यावे.
२) अशासकीय संघटना व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याकडून ज्येष्ठ नागरिकांसाठी एकछत्री सेवा संकल्पनेचा विकास करण्यात यावा.

३) ज्येष्ठ नागरिकांसाठी करमणूक केंद्र / सुविधा केंद्र यासाठी ग्रामपंचायतीने विनामुल्य / नाममात्र दरात जागा यासाठी ग्रामपंचायतीने विनामुल्य / नाममात्र दरात जागा / इमारत इतरत्र उपलब्ध करुन द्यावी.

**सांस्कृतिक कार्य व पर्यटन विभाग :**

१) पर्यटन निवास संकुलामध्ये विना हंगामाच्या कालावधीत ज्येष्ठ नागरिकांना सवलत देण्यात यावी. त्याचप्रमाणे पर्यटन हंगामाच्या कालावधीत ज्येष्ठ नागरिकांना प्राधान्य देण्यात यावे.
२) मनोरंजन व सर्जनशील कला कार्यक्रम यांचा विकास करण्यात यावा.
३) वृद्ध कलावंताना मानधन देण्याची योजना राबविण्यात यावी.

**सामान्य प्रशासन विभाग :**

१) शासकीय व निमशासकीय कार्यालयातील ज्येष्ठ नागरिकांच्या समस्या प्रकरणी शीघ्र कार्यवाही होण्यासाठी विशेष प्राधान्य देण्यात यावे. त्यासाठी सूचना संबंधितांना निर्गमित करण्यात याव्यात.
२) ज्येष्ठ नागरिकांचे प्रश्न अतिशय व्यापक व त्यांचे विविध पैलू असल्यामुळे त्यांचे प्रश्न सोडविण्यासाठी ज्या स्वयंसेवी संस्था, जे शासकीय अधिकारी/कर्मचारी काम करतात त्यांना प्रशिक्षण देण्यात यावे.

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग**

१) "वृद्ध चिकीत्सा काळजी" करीता समन्वयीत प्रकल्पाद्वारे जोमाने संशोधन व विकासासाठी प्रयत्न करण्यात यावे.
२) वृद्धत्व प्रक्रियेत मंदगती / विलंब करणाऱ्या प्रक्रियांवर सखोल संशोधन करण्यात यावे.
३) जीवनदायी आरोग्यदायी योजनेतंर्गत आयुष घटकांचा (आयुर्वेद / होमिओपॅथी / युनानी / योग व निसर्गोपचार) समावेश करण्यात यावा.

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

सर्व सहकारी गृहनिर्माण संस्थामध्ये परिसरातील सर्व ज्येष्ठ नागरिकांच्या वापरासाठी जागा उपलब्ध करुन देण्याचा प्रयत्न करण्यात यावा. सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या उपविधीमध्ये तशी सुधारणा करण्यात यावी.

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

निराधार व निराश्रीत ६० वर्षावरील ज्येष्ठ नागरिकांना अंत्योदय योजनेतंर्गत स्वस्त दराने व प्राथम्याने शिधा देण्यात यावी.

**सार्वजनिक बांधकाम विभाग :-**

सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभागाच्या अंतर्गत असलेल्या शासकीय इमारतीत ज्येष्ठ नागरिकांना Right of Persons with Disabilities Act, २०१६ नुसार रॅम्प व प्रसाधन गृहाची तथा इतर आवश्यक सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी.

**वित्त विभाग :-**

वृध्दांना आश्रय देणाऱ्या व त्यांची देखभाल करण्याऱ्या पाल्यांना केंद्र सरकारकडे आयकरात सुट देणेसंदर्भात प्रस्ताव पाठवावा व पाठपुरावा करावा.

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग :-**

वृध्दांच्या ज्ञानाच्या कौशल्याचा वापर शासन, स्थानिक स्वराज्य संस्था तसेच खाजगी संस्थांना आवश्यक असल्यास करुन घेण्यासाठी योजना तयार करावी.

**खालील बाबी विभागवार संयुक्तरित्या राबवतील.**

**नगरविकास / गृहनिर्माण विभाग :-**

म्हाडा व सिडको, MMRDA, NIT सारख्या संस्थाकडून विविध ठिकाणी गृहनिर्माण प्रकल्प उभारण्यात येत आहेत, अशा सर्व प्रकल्पात वृध्दांसाठी आवश्यक त्या सर्व सोयी-सुविधा करण्यात याव्यात.

**नगर विकास / ग्रामविकास विभाग :-**

१) ज्येष्ठ नागरिकांसाठी दिवसभराच्या काळात देखभाल व विरंगुळा केंद्र (Day Care Centre) स्थापन करण्यात यावे.
२) ज्येष्ठ नागरिकांची काळजी घेण्याची जबाबदारी प्रत्येक स्थानिक प्राधिकरणाची राहील.
३) **शहराचा वृद्ध मित्र म्हणून विकास करणे** - आधुनिक वैद्यकीय सुविधांमुळे वाढते आर्युमान, परिणामी ज्येष्ठ नागरिकांच्या लोकसंख्येत होणारी प्रचंड वाढ यांचे गांभिर्य लक्षात घेऊन वृध्दापकाळातील अडचणी दूर करुन वृध्दांचे जगणे सुसह्य करण्यासाठी शहरांचा वृद्ध मित्र म्हणून विकास करण्याची संकल्पना जागतिक आरोग्य संघटनेने स्विकारली आहे. सर्व स्थानिक स्वराज्य संस्थामार्फत ही संकल्पना राबिवली जाईल. ज्यामध्ये स्वयंसेवी संस्थांमार्फत विरंगुळा केंद्रे व स्मृतीभ्रंश केंद्रे यांची स्थापना करणे, वृध्दांना मोफत अथवा अल्प दराने वाहतुक व्यवस्था उपलब्ध करुन देणे व त्यामध्ये त्यांच्यासाठी आसने सुरक्षित ठेवणे, आजी-आजोबा उद्यानाची व्यवस्था करणे व त्यात स्वच्छता गृह व इतर सोयी पुरविणे, त्यांच्यासाठी विविध करमणूक व आरोग्य विषयक कार्यक्रमांचे आयोजन करणे,

सदर विरंगुळा केंद्रात फिजीओथेरपी, नेत्रतपासणी, प्रथमोपचार, रक्तदाब व रक्तशर्करा तपासण्याची व्यवस्था व आरोग्य प्रशिक्षण या बाबींचा देखिल समावेश असेल. तसेच सिनेमागृह, नाटकामध्ये सवलतीच्या दराना प्रवेश देणे व त्यांचेसाठी आसन आरक्षित ठेवणे, ज्येष्ठ नागरिक दिन साजरा करणे, त्यांचेसाठी ग्रंथालयाची सुविधा मोफत वा सवलतीच्या दराने उपलब्ध करुन देणे इत्यादी बाबींचा समावेश करण्यात यावा.

**गृह / ग्रामविकास / महसूल विभाग :-**

१) ज्येष्ठ नागरिकांच्या संरक्षणाखाली "वार्डन योजना" परिणामकारकरित्या राबविण्यात यावी. त्यासाठी पोलीस व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्यात समन्वय राखण्यात यावा.
२) मुंबईत ६० वर्षावरील ज्येष्ठ नागरिकांसाठी पोलीसांनी सुरु केलेली मदत वाहिनी क्रमांक १०३ व क्रमांक १०२९ प्रमाणेच राज्यातील सर्व जिल्हा व तालुका स्तरावर अशा प्रकारची सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत प्रयत्न करण्यात यावा.

**सार्वजनिक आरोग्य विभाग / माहिती व जनसंपर्क महासंचालनालय :-**

वृद्धांचे आरोग्य,शिक्षण कार्यक्रम सुनिश्चित करणे या प्रयोजनाकरीता मुख्य प्रसारमाध्यमे व इतर संदेशमार्ग यांचा वापर करण्याचा व त्यांना बळकटी देण्याचा प्रयत्न करावा.

**सार्वजनिक आरोग्य / वैद्यकीय शिक्षण विभाग :-**

१) ज्येष्ठ नागरिकांना नियमितपणे आरोग्यविषयक व मानसिक समुपदेशनाचा फायदा मिळेल याकरीता आरोग्य कर्मचाऱ्यांची सेवा व रुग्णालयाच्या विस्तारीत कार्यक्रम सेवेचा भाग म्हणून उपलब्ध करावा. खाजगी रुग्णालय व तज्ञांनाही त्यात सहभागी करुन घ्यावे.
२) खाजगी वैद्यकीय सेवा देणाऱ्या डॉक्टरांनी "फी" मध्ये ज्येष्ठ नागरिकांना सवलत देण्यासाठी त्यांना आवाहन करण्यात यावे.

**गृह/सार्वजनिक आरोग्य/सामाजिक न्याय/नगर विकास/ग्राम विकास/सामान्य प्रशासन विभाग :-**

**ज्येष्ठ नागरिकांचे संबंधित खालील दिवस पाळण्यात यावे.**

अ) १५ **जून - ज्येष्ठ नागिरक छळ प्रतिबंध जागृती दिवस** (World Elderly Abuse Awareness Day)
ब) २१ सप्टेंबर - जागतिक (स्मृतीभ्रंश) दिवस (World Alzheimer's Day)
क) १ ऑक्टोबर - जागतिक ज्येष्ठ नागरिक दिवस (International Day of Older Person.)

या दिवशी वृत्तपत्रात जाहिराती देणे, सार्वजनिक पदयात्रा, प्रभात फेऱ्या, सभा विशेष कार्य केलेल्या ज्येष्ठांचा व ज्येष्ठ नागरिकांसाठी काम करणाऱ्या बिगर सरकारी संस्थांचा सत्कार व गौरव इ. कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत

ग्राम विकास / नगर विकास विभागांतर्गत महानगरपालिका, नगरपालिका व स्थानिक स्वराज्य संस्था अंतर्गतही वरील दिवस पाळण्यात यावे.

**सामाजिक न्याय / गृह विभाग / माहिती व जनसंपर्क महासंचालनालय :-**

ज्या ज्येष्ठ नागरिकांची मुले व नातेवाईक देखभाल करीत नसल्यामुळे ज्येष्ठ नागरिकांना वृध्दाश्रमात रहावे लागते अशा पाल्यांच्या नावांची यादी (Defaulter List) जाहीर करुन त्या यादीला व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

**उद्योग व कामगार / ग्राम विकास / नगर विकास विभाग :-**

सक्षम ज्येष्ठ नागरिकांना अर्धवेळ नोकऱ्या मिळविण्यासाठी मदत करण्यात यावी. काही लघुउद्योग प्राधान्याने ज्येष्ठ नागरिकांसाठी देण्यात यावेत. (उदा. पाकिटे, उदबत्या, मेणबत्या, पापड बनविणे, इत्यादी) लघुकर्ज (Microfinance) मिळविण्यासाठी मदत करण्यात यावी तसेच बचत गट सुद्धा स्थापन करण्यात यावेत. ज्येष्ठ नागरिकांसाठी काम करणाऱ्या ज्येष्ठ नागरिक संघ, बिगर सरकारी संघटना व स्वयंसेवी संस्थांना Helpline द्वारे कायदेशीर मदत देण्यात यावी.

**सामान्य प्रशासन / विधी व न्याय / सार्वजनिक बांधकाम विभाग :-**

ज्येष्ठ नागरिकांच्या समस्या निवारण्यामध्ये स्वयंसेवी संस्थांचा सततचा सहभाग हा अत्यंत मोलाचा आहे. चॅरिटेबल ट्रस्ट, धार्मिक / इतर संस्था यांना सेवा पुरविण्याचे कार्यक्षेत्र विस्तृत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहित करण्यात यावे. शासकीय / निमशासकीय संस्था / कार्यालये, समाज मंदिरे, विरंगुळा केंद्रे येथील जागा ठराविक दिवशी ठराविक वेळेमध्ये ज्येष्ठ नागरिकांच्या कार्यक्रमाकरिता उपलब्ध करुन देण्यात यावी.

**सामाजिक न्याय / सामान्य प्रशासन विभाग :-**

ज्येष्ठ नागरिकांच्या प्रश्नांचे आस्थापूर्वक सोडवणूक होण्यासाठी व विविध विभागामार्फत राबवावयाच्या योजनांचे सनियंत्रण व्हावे याकरिता सामाजिक न्याय विभाग आणि सर्व शासकीय विभाग यामध्ये समन्वय साधण्यासाठी विभागामध्ये उप सचिवांच्या स्तरावर कक्षाची स्थापना करण्यात यावी. तसेच सामाजिक न्याय विभागाच्या आयुक्तालय (समाज कल्याण) स्तरावर ज्येष्ठ नागरिकां संदर्भात विषयासाठी स्वतंत्र कक्षाची निर्मिती करण्यात यावी.

**सामाजिक न्याय / नगर विकास / ग्राम विकास / विधी व न्याय विभाग (धर्मदाय आयुक्त) :-**

१) वयोवृद्ध व्यक्तींसाठी काम करणाऱ्या संघटना व अशासकीय संघटना यांनी केलेले प्रयत्न व काम यामध्ये या संस्थांची महत्वाची भूमिका असेल आणि या योजना व कार्यक्रम यांची रचना, नियोजन आणि संनियंत्रण करतेवेळी या संस्थांनी राज्य शासनाशी संपर्क ठेवणे आवश्यक असेल.

२) वयोवृद्ध व्यक्तींचे सक्षमीकरण व पुनवर्सन याबाबतचे पंचवार्षिक व वार्षिक कार्यक्रम तयार करण्यात यावेत आणि सर्व नागरी, ग्रामीण व स्थानिक स्वराज्य संस्था/मंडळे (अशासकीय संस्था) या कार्यक्रमांचे कार्यान्वयन करतील. या कार्याचे समन्वयन व सनियंत्रण सामाजिक न्याय विभागाद्वारे करण्यात यावेत.

**वित्त / नगरविकास / ग्रामविकास विभाग :-**

ज्येष्ठ नागरिकांना ज्याप्रमाणे आयकरामध्ये, प्रवासामध्ये व इतर बाबतीत सवलत देण्यात येते. त्याचप्रमाणे ग्रामपंचायत, महानगरपालिका, नगर पालिका देयकरामध्ये, मालमत्ता कर इत्यादी करामध्ये सूट / सवलत देण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

**महसुल / सार्वजनिक बांधकाम विभाग :-**

शासनाच्या निवासी संकुलात वृध्दाश्रमासाठी तथा ज्येष्ठ नागरिकांच्या सुविधेसाठी जागा उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

**सर्व प्रशासकीय विभाग :-**

१) राज्याचा प्रत्येक विभाग राज्याच्या धोरणाच्या मार्गदर्शक तत्वान्वये विनिर्दिष्ट कार्यक्रमांचा निर्देश करील व त्यानुसार वयोवृद्ध व्यक्तींसाठी योजना व कार्यक्रम राबविण्यात याव्यात.

२) कार्यक्रम व योजना याबाबतची माहिती विभागाच्या कार्यक्रम अंदाजपत्रकातील स्वतंत्र प्रकरणामध्ये देण्यात यावी. सामाजिक सुरक्षा, शिक्षण, वित्तीय संरक्षण, वयोवृद्ध व्यक्तींची उत्पादकता यासंबंधीच्या प्रशिक्षणाचे प्रतिबिंब नियोजन प्रक्रियेत दिसून यावे.

३) वयोवृद्ध व्यक्तींची सामाजिक सुरक्षेच्या धोरणाची अमंलबजावणी शासनाचे सर्व विभाग, निमशासकीय संस्था, स्थानिक स्वराज्य संस्था, अशासकीय संघटना व वयोवृद्ध व्यक्तींच्या कल्याणासाठी  कार्यरत असलेल्या इतर संबंधित संघटना यांच्याकडून पालन करण्यात यावे. वृद्धांना ज्या काही परवाना / मान्यतेची आवश्यकता असेल त्याबाबत सर्व संबंधित प्राधिकरणांनी वृध्दांना प्राथम्याने सहाय्य करावे.

४) प्रत्येक विभागानी तथा स्थानिक स्वराज्य संस्थांनी ज्येष्ठ नागरिकांसाठी योजना / सुविधा / कार्यक्रम इत्यादीची जाहिरात नियमितपणे (किमान दर ३ महिन्यांनी) करावी.

**प्रत्येक विभागांनी ज्येष्ठ नागरिकांसाठी योजना / सुविधा / कार्यक्रम इत्यादीवरील खर्च त्यांच्या विभागांतर्गत उपलब्ध निधीतून करावा. तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांनी (महानगरपालिका / नगर परिषद / नगर पंचायती / जिल्हा परिषद / पंचायत समिती / ग्राम पंचायती) ज्येष्ठ नागरिकांसाठी योजना / सुविधा / कार्यक्रम इत्यादीवरील खर्च त्यांचेकडील उपलब्ध निधीतून करावा.**

सदर शासन निर्णय दि. ३०/०९/२०१३ रोजी मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७१०१७३७१९६१२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant haridas Wade

Digitally signed by Chandrakant haridas Wade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justic and S. A., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fda96a8ca4dd3ecbdbbe4b156e5eaa93f60f3e037cbbbbdefe9e2961f45f0960, cn=Chandrakant haridas Wade
Date: 2018.07.11 12:21:31 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) अमुस / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
८) आयुक्त, समाज कल्याण, म.रा. पुणे
९) संचालक, सार्वजनिक आरोग्य, महाराष्ट्र राज्य
१०) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१२) धर्मदाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
१३) सर्व जिल्हाधिकारी

१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व आयुक्त / मुख्याधिकारी (महानगरपालिका / नगर परिषद / नगर पंचायती)
१६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
१७) सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण
१८) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०) निवडनस्ती - सामासू.